**परभणी शहरातील आदिवासी मुलां-मुलींच्या शासकीय वसतीगृहाच्या बांधकामाकरीता मराठवाडा विकास महामंडळ मर्या.,छत्रपती संभाजीनगर यांची दुय्यम कंपनी परभणी कृषी गो-संवर्धन मर्या.यांची ५.११ हेक्टर आर जमीन रेडीरेकनर मूल्यास हस्तांतरीत करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**उद्योग,ऊर्जा, कामगार व खनिकर्म विभाग**
**शासन निर्णय क्रमांक :- मविम-२०२३/ प्र.क्र.१०/ उद्योग-१०**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक :-१६ मार्च,२०२४.

**वाचा :-**१. आदिवासी विकास विभाग शासन ज्ञापन क्रमांक :- आकाइ-१४२२/ प्र.क्र.२०५/ का.०५, दिनांक ३१ जुलै, २०२३ व दिनांक २ ऑगस्ट, २०२३.
२. आदिवासी विकास विभाग शासन निर्णय क्रमांक :- आकाइ-१४२२/ प्र.क्र.२०५/ का.०५, दिनांक २२ नोव्हेंबर, २०२३.
३. आदिवासी विकास विभाग शासन निर्णय क्रमांक :- बीयुडी-२०२३/ प्र.क्र.२/ कार्यासन-०६, दिनांक ८ जानेवारी, २०२४.
४. आदिवासी विकास विभाग शासन निर्णय क्रमांक :- आकाइ-१४२२/ प्र.क्र.२०५/ का.०५, दिनांक १५ फेब्रूवारी, २०२४.

**प्रस्तावना :-** उद्योग, ऊर्जा व कामगार विभागाच्या प्रशासकीय नियंत्रणाखालील"मराठवाडा विकास महामंडळ मर्या., छत्रपती संभाजीनगर यांची दुय्यम कंपनी परभणी कृषी गो-संवर्धन मर्यादित" यांची ५.११ हेक्टर आर जमीन "एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प कार्यालय, कळमनुरी अंतर्गत परभणी शहरात आदिवासी मुलांचे २ व मुलींचे ३ असे एकूण ५ शासकीय वसतीगृहे" उभारण्यासाठी उपलब्ध करुन देणेबाबतचा प्रस्ताव आदिवासी विकास विभागाकडून उद्योग विभागास सादर केला.

आदिवासी विकास विभागाने शासन ज्ञापन दिनांक ३१ जुलै, २०२३ व दिनांक २ ऑगस्ट, २०२३ अन्वये "मराठवाडा विकास महामंडळ मर्या., छत्रपती संभाजीनगर यांची दुय्यम कंपनी परभणी कृषी गो-संवर्धन मर्यादित" यांची ५.११ हेक्टर आर जमीन रु.१३,१९,९४,०००/- या रेडीरेकनर मूल्यास खरेदी करण्यास मान्यता दिलेली आहे.

"मराठवाडा विकास महामंडळ मर्या., छत्रपती संभाजीनगर यांची दुय्यम कंपनी परभणी कृषी गो-संवर्धन मर्यादित" यांची ५.११ हेक्टर आर जमीन आदिवासी विकास विभागास हस्तांतरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-** उद्योग, ऊर्जा व कामगार विभागाच्या प्रशासकीय नियंत्रणाखालील मराठवाडा विकास महामंडळ मर्या., छत्रपती संभाजीनगर यांची दुय्यम कंपनी परभणी कृषी गो-संवर्धन मर्यादित यांची खालील विवरणपत्रात दर्शविलेली ५.११ हेक्टर आर जमीन आदिवासी विकास विभागास

रु.१३,१९,९४,०००/- ( रुपये तेरा कोटी एकोणीस लक्ष चौऱ्याण्णव हजार फक्त ) या रेडीरेकनर मूल्यास हस्तांतरीत करण्यास खालील अटी व शर्तींच्या अधीन राहून या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे.

आदिवासी विकास विभागास आदिवासी मुलांचे २ व मुलींचे ३ असे एकूण ५ शासकीय वसतीगृहे" उभारण्यासाठी रेडीरेकनर मूल्यास हस्तांतरीत करावयाच्या जमीनीचा तपशील खालीलप्रमाणे आहे.

| अ.क्र. | गावाचे नांव | परभणी कृषी गो-संवर्धन मर्या. यांची जमीन गट नं. / सर्व्हे नं. | परभणी कृषी गो-संवर्धन मर्या. यांची जमीन हेक्टर आर. | आदिवासी विकास विभागास रेडीरेकनर मूल्यास हस्तांतरीत करावयाची जमीन हेक्टर आर | आदिवासी विकास विभागास रेडीरेकनर मूल्यास हस्तांतरीत करावयाच्या क्षेत्राचे मूल्यांकन |
|---|---|---|---|---|---|
| १. | परभणी शहर | सर्व्हे नं.५११ | १.७७ | १.७२ | रु. ८,०१,९९,०००/- |
| २. | | सर्व्हे नं.५१३ | १.७६ | १.५४ | रु. ३,२६,७०,०००/- |
| ३. | | सर्व्हे नं.५१५/२ | १.८७ | १.८५ | रु. १,९१,२५,०००/- |
| | | | | ५.११ | रु.१३,१९,९४,०००/- |

आदिवासी विकास विभागाने खालील लेखाशिर्षाखाली सन २०२३-२४ या वित्तीय वर्षाच्या अर्थसंकल्पिय तरतूदीतून रु.१३,१९,९४,०००/- उद्योग विभागास पुस्तकी समायोजनाद्वारे बीडीएसवर वितरित करण्यास मान्यता दिली आहे.

मागणी क्रमांक टी-६
०२, अनुसूचित जमातीचे कल्याण
७९६ ,(०१) (०१) जनजाति क्षेत्र उपयोजना
(०१) (०४) (४२२५ ०१३१) भूमीसंपादन ( कार्यक्रम )
५३ मोठी बांधकामे

आदिवासी विकास विभागाने उपरोक्त लेखाशिर्षाखालील सन२०२३-२४ या वित्तीय वर्षाच्या तरतूदीतून उद्योग विभागाच्या "मराठवाडा विकास महामंडळाकडून शासनास कर्जाची परतफेड" च्या खालील जमालेखाशिर्षाखाली रु.१०,५२,४०,१२०/- पुस्तकी समायोजनाद्वारे जमा करण्यास मान्यता दिलेली आहे.

६८८५-उद्योग व खनिजे यासाठी इतर कर्जे
०२- मागास क्षेत्र विकास
१९०- सार्वजनिक क्षेत्र व इतर उपक्रम यांना कर्जे
(०२) विकास महामंडळास कर्जे
(०२) (०३) राज्य शासनाने प्रोत्साहन योजनांसाठी दिलेल्या कर्जाची मराठवाडा विकास महामंडळाकडून परतफेड (६८८५ ५१४ २०१ )

मराठवाडा विकास महामंडळ मर्या., छत्रपती संभाजी नगर यांची दुय्यम कंपनी परभणी कृषी गो-संवर्धन मर्या. यांच्या ५.११ हेक्टर आर जमीनीच्या पुस्तकी समायोजनाने विक्री व्यवहारावर रु.२,६७,५३,८८०/- इतका कॅपिटल गेन टॅक्स मराठवाडा विकास महामंडळ/ परभणी कृषी गो-संवर्धन मर्या. यांनी जमा करणे अपेक्षित आहे.

आदिवासी विकास विभागाने सदर जमीन व्यवहारावरील कॅपिटल गेन टॅक्स भरण्याकरीता मराठवाडा विकास महामंडळाच्या खालील बँक खात्यामध्ये रु.२,६७,५३,८८०/- इतका निधी सन २०२३-२४ या वित्तीय वर्षाकरिता (४२२५ ०१३१) या सांकेतांकाखालील उपलब्ध तरतूदीतून वितरित करण्यास मान्यता दिलेली आहे.

| | | |
|---|---|---|
| १. | बँकेचे नांव | स्टेट बँक ऑफ इंडिया |
| २. | शाखेचे नांव | क्रांती चौक, औरंगाबाद |
| ३. | बँक खाते क्रमांक | 11134725300 |
| ४. | IFSC Code | SBIN0001716 |
| ५. | MICR Code | 431002002 |
| ६. | महामंडळाचा TAN number | NSKM02728F |
| ७. | महामंडळाचा PAN number | AABCM8809R |

**<u>अटी व शर्ती :-</u>**

१) उद्योग, ऊर्जा व कामगार विभागाच्या प्रशासकीय नियंत्रणाखालील मराठवाडा विकास महामंडळ, छत्रपती संभाजीनगर यांची दुय्यम कंपनी परभणी कृषी गो-संवर्धन मर्यादित यांच्या ५.११ हेक्टर आर सलग जमीनीचा ताबा व्यवस्थापकीय संचालक, मराठवाडा विकास महामंडळ, छत्रपती संभाजीनगर यांनी एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प कार्यालय, कळमनुरी यांना द्यावा.

२) उपरोक्त विवरणपत्रातील परभणी कृषी गो-संवर्धन मर्यादित यांचे ५.११ हेक्टर आर क्षेत्र वगळता उर्वरित जमीनीचा ताबा " परभणी कृषी गो-संवर्धन मर्यादित" यांचेकडे ठेवण्यात यावा.

३) शासनाच्या उद्योग विभागाच्या पूर्व परवानगीशिवाय सदर जमीन किंवा तिचा कोणताही भाग किंवा तिच्यातील कोणतेही हितसंबंध विक्री / देणगी देऊन / अदला बदल करुन / गहाण ठेऊन / पट्टयाने देऊन / खाजगी सार्वजनिक सहभाग तत्वावर किंवा बाहय यंत्रणाद्वारे किंवा अन्य कोणत्याही प्रकारे हस्तांतरीत करता येणार नाही. सदर जमिनीवर अथवा त्याच्या कोणत्याही भागावर अन्य व्यक्ती / संस्था / कंपनी इत्यादींचे कोणत्याही प्रकारचे हक्क निर्माण होतील अशा प्रकारे हस्तांतरीत करता येणार नाही. तसेच शासनाच्या उद्योग विभागाच्या पूर्वमान्यतेशिवाय सदर जमिनीचे पोटविभाजन करता येणार नाही.

४) एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प कार्यालय, कळमनुरी हे विषयांकित जमिनीचा वापर केवळ मंजूर प्रयोजनासाठी करतील. अन्य कोणत्याही प्रयोजनासाठी सदर जमिनीचा अथवा त्याच्या कोणत्याही भागाचा तात्पुरता अथवा कायमस्वरुपी वापर करावयाचा झाल्यास त्यासाठी शासनाच्या उद्योग विभागाची पूर्वमान्यता आवश्यक राहील.

५) विषयांकित जमिनीवर संबंधित नियोजन प्राधिकरणाच्या विहित परवानगीने व मंजूर विकास नियंत्रण नियमावलीनुसार विकास होणे बंधनकारक राहील. तसेच या व्यतिरिक्त अन्य संबंधित विभाग / शासकीय यंत्रणा यांची मान्यता / पूर्वपरवानगी / ना-हरकत घेणे देखील बंधनकारक राहील.

६) सदर  जमीनीचे ज्या प्रयोजनासाठी वाटप केले त्या प्रयोजनासाठी वापर करणे अनिवार्य राहील.

७) सदर जागेवरील नियोजित प्रयोजनामुळे लगतच्या खातेदारांना कोणत्याही प्रकारचा त्रास होणार नाही, त्यांच्या वैध वहीवाटीस बाधा येणार नाही, याची दक्षता घेण्यात यावी.

८) प्रस्तावित जमीन मंजूरी संदर्भातील इतर नियमित अटी व शर्ती या ठिकाणी लागू राहतील.

९)जिल्हाधिकारी, परभणी यांनी या जमिनीच्या बाबत फेरफार, ७/१२, ८ ( अ ) तसेच अन्य ठिकाणी सुधारित नोंदी महसूली अभिलेखात घ्याव्यात.

१०) पुस्तकी समायोजनाने उपलब्ध केलेल्या निधीचा ताळमेळ प्रकल्प अधिकारी,  एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प कार्यालय, कळमनुरी व व्यवस्थापकीय संचालक,मराठवाडा विकास महामंडळ, छत्रपती संभाजीनगर यांनी घ्यावा.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्यांचा संकेतांक २०२४०३१६१५३७४०६६१० असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवांने,

SANJAY SHAMKANT DEGAONKAR

Digitally signed by SANJAY SHAMKANT DEGAONKAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=INDUSTRIES ENERGY AND LABOUR DEPARTMENT,
2.5.4.20=de0a2ca7914a3c02f24aa23655f609f41f2d36b0ec57da4c71f19aaf08230a79, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=56CF8C8577584ADC42F070185C585C41084CC34F6683553D21CCACBFA33D4D1F, cn=SANJAY SHAMKANT DEGAONKAR
Date: 2024.03.16 15:47:30 +05'30'

**( संजय देगांवकर )**
**सहसचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

मा.राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मुंबई.
मा.मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव,मंत्रालय, मुंबई.
मा.मंत्री ( उद्योग ),मंत्रालय, मुंबई.
मा.मंत्री ( आदिवासी विकास ),मंत्रालय,मुंबई.
मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.
अपर मुख्य सचिव, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
प्रधान सचिव (उद्योग) , उद्योग,ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई.
आयुक्त, आदिवासी विकास ,नाशिक.
जिल्हाधिकारी, परभणी.
अपर आयुक्त, आदिवासी विकास, अमरावती.
व्यवस्थापकीय संचालक, मराठवाडा विकास महामंडळ, छत्रपती संभाजीनगर.
जिल्हा कोषागार कार्यालय, हिंगोली.
प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, कळमनुरी, जि.हिंगोली.
कक्ष अधिकारी (सार्वजनिक उपक्रम ),वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
निवडनस्ती ( उद्योग-१० )